उपजिल्हा रुग्णालय तुमसर व साकोली, जि. भंडारा येथे पुरविण्यात आलेल्या कंत्राटी वस्त्रधुलाई सेवेचे प्रलंबित देयके अदा करण्यास परवानगी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२४/प्र.क्र.५९/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १२ मार्च, २०२४.

वाचा :

१) **सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालय (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक- आसेआ/कक्ष-३/टे-९/वस्त्रधुलाई प्रलंबित देयके/२०४३-४५/२४ दि.०५.०१.२०२४**

**प्रस्तावना :**

उपजिल्हा रुग्णालय, तुमसर व साकोली जि. भंडारा येथे पुरविण्यात आलेल्या कंत्राटी वस्त्रधुलाई सेवेची माहे एप्रिल २०१९ ते मार्च २०२० या कालावधीतील प्रलंबित देयके अदा करण्यास कार्येत्तर मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :

उपजिल्हा रुग्णालय, तुमसर, जि. भंडारा येथे मे. पार्वता बहुउद्देशिय सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. तुमसर, जि. भंडारा यांच्याकडून पुरविण्यात आलेल्या कंत्राटी वस्त्रधुलाई सेवेचे रु. ३,१८,९९६/- (अक्षरी रुपये तीन लक्ष अठरा हजार नऊशे शहान्नव फक्त) इतक्या रक्कमेचे व उपजिल्हा रुग्णालय, साकोली, जि. भंडारा येथे मे. राजश्री शाहू महाराज बहुउद्देशिय सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. बेला, जि. भंडारा यांच्याकडून पुरविण्यात आलेल्या कंत्राटी वस्त्रधुलाई सेवेचे रु. ३६,६४८/- (अक्षरी रुपये छत्तीस हजार सहाशे अठ्ठेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेचे अशा एकूण रु. ३,५५,६४४/- (अक्षरी रुपये तीन लक्ष पंच्यावन्न हजार सहाशे चौवेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेचे प्रलंबित देयके अदा करण्यास कार्येत्तर मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र | आरोग्य संस्थेचे नाव | पुरवठादाराचे नाव | देयकाचा कालावधी | प्रलंबित देयकाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | उपजिल्हा रुग्णालय तुमसर, जि. भंडारा | मे.पार्वता बहुउद्देशिय सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. तुमसर, जि. भंडारा | माहे एप्रिल २०१९ ते ऑक्टोंबर २०१९ | रु. ३,१८,९९६/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २. | उपजिल्हा रुग्णालय साकोली, जि. भंडारा | मे. राजश्री शाहू महाराज बहुउद्देशिय सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. बेला, जि. भंडारा | माहे आक्टोंबर २०१९ ते मार्च २०२० | रु. ३६,६४८/- |
| | | **एकूण** | | **रु. ३,५५,६४४/-** |

<u>अटी व शर्ती</u>-:

१) यापूर्वी देण्यात आलेल्या कार्यरंभ आदेशातील व करारातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

२) सदर प्रलंबित देयके अदा करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/शासन निर्णय/परिपत्रके/नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

३) सदर देयके योग्य असल्याची तसेच प्रलंबित देयके दुबार अदा करण्यात आले नसल्याची खातरजमा करुनच अदायगी करण्यात यावी. याबाबतची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

४) सदर देयके सार्वजनिक आरोग्य विभाग, मागणी क्र. आर १, २२१० वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य ०१- नागरी आरोग्य सेवा-विषम चिकीत्सा, ११० - रुग्णालये व दवाखाने. (०१) (०८) प्राथमिक आरोग्य केंद्रांचा ग्रामिण रुग्णालया इतका दर्जा सुधारणे (२२१० ०४१३) (१० कंत्राटी सेवा) यामधून खर्च भागविण्यात येणार आहे.

२. सदर शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ दि.१७ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग - पहिला, उपविभाग - एक मधील अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार व त्यात नमुद अटीची पुर्तता करण्याच्या अटीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१५३४२९८११७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.03.12 15:53:04 +05'30'

**( क. प्र. पिसे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, भंडारा.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. भंडारा.
८. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, तुमसर व साकोली, जि. भंडारा
९. निवडनस्ती (आरोग्य-३).